**"बंदरालगतच्या सुखसोयी" या जिल्हा वार्षिक योजनांतर्गत योजनेच्या अंमलबजावणीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह (बंदरे) विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएलएन - ०८१०/ प्र.क्र. २२९/बंदरे-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक ०७ मार्च, २०११.**

**वाचा :- १) शासन, नियोजन विभाग, निर्णय क्र. जिवायो - १००७/ प्र क्र ३९ / का - १४८४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८.**
**२) शासन, नियोजन विभाग पत्र क्र. जिवायो - १००९/ प्र क्र २१३ / का- १४८१, दिनांक ३० डिसेंबर, २००९.**

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीचा समुद्रकिनारा लाभलेला आहे. कोकणातील अधिकतम लोकवस्ती ही समुद्रकिनाऱ्यालगत असून त्यातील बहुतांशी लोकांची शेती व मासेमारी ही उदरनिर्वाहाची प्रमुख साधने आहेत. किनारवर्ती क्षेत्रातील वाहतूक प्रामुख्याने जलवाहतुकीव्दारे बोटी, होडया, छोटया / मध्यम आकाराची यांत्रिक / बिगर यांत्रिक जलयाने याव्दारे केली जाते. जलवाहतुकीव्दारे मासेमारी, व्यापार, पर्यटन इ. क्षेत्रांचा विकास होतो. त्याकरीता प्रवाशांकरीता बंदरालगतच्या विविध प्रवासी सुविधा शासनाकडून उपलब्ध करण्यात येतात.

या सुविधा पुरविण्याकरीता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून (अ) प्रवासी सुखसोयी व इतर स्थापत्य व अभियांत्रिकी कामे आणि (ब) बंदरालगतच्या सुखसोयी अशा दोन योजना राबविण्यात येत होत्या. या दोन योजनांचे एकत्रिकरण करुन त्याऐवजी 'बंदरालगतच्या सुखसोयी' ही एकच योजना राबवावी, असे निदेश नियोजन विभागाने संदर्भ क्र. (२) येथील पत्रान्वये दिले आहेत ही योजना जिल्हा योजना म्हणून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येत असून त्यास संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ यांचेकडून प्रशासकीय मान्यता प्रदान केली जाते. तसेच, नियोजन विभागाने मंजूर केलेल्या जिल्हा वार्षिक योजनेच्या आराखड्यामधील मंजुर तरतुदीनुसार जिल्हाधिकारी यांचेमार्फत निधीचे वितरण मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना प्रचलित कार्यपध्दतीनुसार केले जाते. या जिल्हा वार्षिक योजनेसाठी निधी अर्थसंकल्पित करणे, वितरीत करणे व प्रशासकीय मान्यता देणे याबाबतची सुधारीत कार्यपध्दती उपरोक्त "वाचा" येथील नमूद केलेल्या नियोजन विभागाच्या दि. १६.२.२००८ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

' बंदरालगतच्या सुखसोयी ' ही जिल्हा योजना, प्रशासकीय विभाग म्हणून गृह (बंदरे) विभागाच्या सर्वसाधारण नियंत्रणाखाली राबविण्यात येत आहे. तथापि, या योजनेच्या अंमलबजावणीसाठी धोरणात्मक शासन निर्णय उपलब्ध नव्हता. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी धोरणात्मक शासन निर्णय उपलब्ध करुन देण्याचे निदेश नियोजन विभागाने उपरोक्त 'वाचा' येथील क्र. (२) मधील पत्रान्वये दिले आहेत. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

**"बंदरालगतच्या सुखसोयी"** ही योजना जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत कायमस्वरुपी योजना म्हणून मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या किनारवर्ती जिल्ह्यांमध्ये राबविण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेअंतर्गत हाती घ्यावयाच्या कामांचा प्राथम्यक्रम पुढीलप्रमाणे राहीलः-

(अ) ज्या ठिकाणी प्रवासी सुविधा पुरविण्याची निकड तीव्रतेने भासत आहे, अशी कामे.
(ब) सन्माननिय लोकप्रतिनिधी यांनी केलेली मागणी,
(क) स्थानिक ग्रामस्थ, मच्छिमार संस्था, शेतकरी, प्रवासी जल वाहतूक संस्था, उद्योजक, आयात - निर्यात आस्थापना, पर्यटक इ. घटकांनी केलेली मागणी,

३. या योजनेअंतर्गत प्रवासी व माल वाहतुकीसाठी जलवाहतुकीच्या अनुषंगाने आवश्यक सुविधा पुरविण्यासाठी पुढीलप्रमाणे उपाययोजना हाती घेण्यात याव्या :-

(१) प्रवासी / मालवाहू जेट्टी बांधणे / दुरुस्ती करणे,
(२) बंदरापासून मुख्य मार्गास जोडणारे जोडरस्ते बांधकाम,
(३) बंदरावरील विशेष दुरुस्ती,
(४) बंदरावरील विद्युतीकरण,
(५) ब्रेक वॉटर बांधणे व दुरुस्ती करणे,
(६) जेट्टीला जोडून अगर खाडी किनारी संरक्षण भिंत बांधणे,

४. **'बंदरालगतच्या सुखसोयी '** या जिल्हा योजनांच्या कामांसाठी व दैनंदिन देखभाल दुरुस्तीसाठी निधीची तरतूद, प्रशासकीय व तांत्रिक मान्यता तसेच योजनेची अंमलबजावणी याकरिता नियोजन विभागाच्या दि. १६.२.२००८ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या सुधारीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

५. सदर योजनेसाठी निधीची तरतूद करणे व निधी अर्थसंकल्पित करण्याची कार्यवाही मुख्य लेखाशिर्ष "३०५१ - बंदरे व दिपगृहे" या लेखाशिर्षाखाली करण्यात यावी.

६. प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांना क्रियान्वयन यंत्रणा म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२/११/व्यय-८, दि. १९/१/२०११ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.        सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०३०७१४१९००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र. ता. गौड)
**सह सचिव, गृह विभाग,**
**महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरिक्षा), मुंबई.
महालेखापाल-२ (लेखापरिक्षा), नागपूर.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
आयुक्त, मत्स्यव्यवसाय संचालनालय, चर्नी रोड, मुंबई.
जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग.
किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वांद्रा (पू), मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग.
निवडनस्ती (कार्यासन क्र. बंदरे - २)